शालेय पोषण आहार योजनेसाठी
निधी वितरण (सन २०२०-२१)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२०/प्र.क्र.१००/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ ऑगस्ट, २०२०

**वाचा:-**

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०

२) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र.क्र. ३/२०२०-Desk (MDM) दि.२३ एप्रिल, २०२०

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०

४) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र. ३/२०२०-Desk (MDM) दि.०९जून, २०२०

**प्रस्तावना :-**

शालेय पोषण आहार योजनेंतर्गत केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.२३ एप्रिल,२०२० रोजीच्या आदेशान्वये पहिल्या टप्प्यातील केंद्र हिस्स्याचा तदर्थ निधी रु. ७७५०.४९ लक्ष व संदर्भाधिन दि.९ जून, २०२० रोजीच्या आदेशान्वये रु.१५५००.९७ लक्ष निधी वितरित केला आहे. सदर निधी सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना व अनुसूचित जमाती उपयोजना या घटकांतर्गत उपलब्ध करुन दिलेला आहे. केंद्र शासनाने वितरित केलेल्या निधीपैकी सर्वसाधारण घटकांतर्गत वितरित केलेला केंद्र हिस्स्याचा निधी व त्यास समरुप राज्य हिस्सा वितरित करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. वित्त विभागाने संदर्भाधिन शासन निर्णय दि. ०४ मे, २०२० मधील तरतुदीच्या अनुषंगाने सद्यस्थितीत सर्वसाधारण लेखाशिर्षातंर्गत अर्थसंकल्पित असलेल्या तरतूदीपैकी केंद्र हिस्सा ५ टक्के व राज्य हिस्सा १० टक्के वितरित करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सर्वसाधारण लेखाशिर्षातंगत निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

शालेय पोषण आहार योजनेसाठी केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळून सर्वसाधारण लेखाशिर्षातंर्गत पुढीलप्रमाणे रु.११०००.०० लक्ष (रुपये एकशे दहा कोटी फक्त) निधी लेखाशिर्षनिहाय वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पित तरतूद | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१- प्राथमिक शिक्षण, (०१) (१५) मुंबई महानगरपालिका क्षेत्राव्यतिरिक्त इतर क्षेत्रात शालेय पोषण आहार कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा) (२२०२ ३८०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | रु. ११००००.०० लक्ष | रु. ५५००.०० लक्ष |
| २. | मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१- प्राथमिक शिक्षण, (०१) (१६) मुंबई महानगरपालिका क्षेत्राव्यतिरिक्त इतर क्षेत्रात शालेय पोषण आहार कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा) (२२०२ ३८१५), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" | रु. ५५०००.०० लक्ष | रु. ५५००.०० लक्ष |
| **एकूण** | | **रु. १६५०००.०० लक्ष** | **रु. ११०००.०० लक्ष** |

२. सदरचा निधी वितरणासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून तसेच, उपसंचालक (वित्त व लेखा), शालेय पोषण आहार कक्ष, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकास व दि.०४ मे, २०२० रोजीच्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ६ ते १० मधील अटींची तसेच, परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. प्रस्तुत परिपत्रकातील परिच्छेद क्र. १,२,३,५,६ व ७ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाही. परिशिष्टातील मुद्दा क्र. ०४ नुसार केंद्र शासनाचा निधी प्रत्यक्षात जमा झाल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. १५२/अर्थोपाय, दिनांक २५/०४/२०२० व अनौपचारिक संदर्भ क्र. १८१/अर्थोपाय, दि. २३/०६/२०२० अन्वये दिलेले आहेत.प्रस्तुतप्रमाणे निधी वितरणास वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ३४३/व्यय-५, दि. २३/०७/२०२० अन्वये मान्यता दिली आहे. सदर निधीचा विनियोग वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६ एप्रिल, २०२० च्या परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१११२२७२६८७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA
SHANKARRAO
PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.08.11 12:33:21 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती - एस.डी. ३.